# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्प) अधिवेशन, २०१९

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### आदिवासी विभागातील अनुदानावर आलेल्या माध्यमिक शाळा व तुकड्यांचे अनुदान वितरीत करण्याबाबत

**(१) ४३५२ (०५-०५-२०१०). श्री.जयंत पाटील, श्री.कपिल पाटील :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आदिवासी क्षेत्रातील प्लॅन मधील उच्च माध्यमिक शाळा/माध्यमिक शाळा/ तुकड्यांवरील शिक्षक कर्मचाऱ्यांचे मे, २००९ किंवा त्यादरम्यानचे वेतन अनुदान त्यांचे खात्यात जमा झाले काय,

(२) नक्षलग्रस्त/आदिवासी गडचिरोली जिल्ह्यातील धानोरा तालुक्यातील उच्च माध्यमिक शाळा शिक्षक कर्मचाऱ्यांचे मे, २००९ पासून वेतन अनुदान मिळाले नाही, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासनाने काय कार्यवाही केली,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१५/०२/२०१९) :** (१) होय. सदर शिक्षकांचे वेतन त्यांच्या खात्यात जमा झाले आहे.

(२) हे खरे नाही.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई दहिसर (पश्चिम) येथील प्रसुतीगृह गत पाच वर्षापासून बंद असल्याबाबत

**(२) १४६९५ (०७-०५-२०११). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई दहिसर (पश्चिम) येथील प्रसुतीगृह गत पाच वर्षापासून बंद आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रसुतीगृह बंद पडण्याची कारणे काय आहेत,

(३) तसेच सदरचे प्रसुतीगृह तातडीने सुरु करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१२/०२/२०१९) :** (१) व (२) मे.मित्ती इन्व्हेस्टमेंट ॲण्ड कन्सल्टंसी सर्विसेस प्रा.लि. या संस्थेला सी.टी.एस. क्र.९२१/७, दहिसर गांव, रुस्तमजी कॉलनी, दहिसर (पश्चिम) येथील जागा दिनांक ०८/१२/२००५ रोजी महानगरपालिका ठरावान्वये १० वर्षाच्या कालावधीकरीता प्रसुतीगृह चालविण्यासाठी देण्यात आली होती.

सदर संस्थेने करारपत्रानुसार प्रसुतीगृह विषयक सेवा न देता इतर अतिरिक्त सेवा पुरविल्यामुळे महानगरपालिकेशी केलेल्या करारपत्रातील अटी व शर्तीचा भंग केला. त्यामुळे महानगरपालिकेमार्फत सदर संस्थेस प्रथमत: कारणे दाखवा नोटीस व नंतर टर्मिनेशन नोटीस देण्यात आली.

तद्‌नंतर सदर संस्थेने मा.उच्च न्यायालयात बृहन्मुंबई महानगरपालिकाविरुध्द जनहित याचिका क्रमांक ९९/२०१४ अन्वये दावा दाखल केला व सदर प्रकरणी मा.न्यायालयाने दिलेल्या आदेशान्वये सदर संस्थेने प्रसुतीगृह बंद केल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

(३) व (४) सदर टर्मिनेशन नोटीसला अनुसरुन मे.मित्ती इन्व्हेस्टमेंट ॲण्ड कन्सल्टंसी सर्विसेस प्रा.लि. या संस्थेकडून महानगरपालिकेमार्फत रुपये १.४३ कोटी इतके प्रमाणित भाडे दंड स्वरुपात वसुल करण्यात आले आहे.

सदर जागेत प्रसुतीगृहासह इतर आरोग्य विषयक सेवा देण्यासाठी रुग्णालय सुरु करण्याबाबतची पुढील कार्यवाही सुरु असल्याचे महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

---

## धामक (जि.अमरावती) येथील प्राथमिक आरोग्य केंद्रात कर्मचाऱ्यांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(३) १८४९५ (०२-०५-२०१६). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) धामक (जि.अमरावती) येथील प्राथमिक आरोग्य केंद्रात कर्मचाऱ्यांची अनेक पदे रिक्त असून केवळ एकच वैद्यकीय अधिकारी कार्यरत असल्याने रुग्णांची गैरसोय होत असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर आरोग्य केंद्रातील रिक्त पदे भरुन रुग्णांना दर्जेदार आरोग्य सुविधा पुरविण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (१९-१२-२०१८) :** (१) हे खरे नाही.

आरोग्य सहायकाचे १ पद वगळता बाकी सर्व पदे भरलेली आहेत.
(२) आरोग्य सहायकाचे १ पद रिक्त आहे. रिक्त पद भरण्याबाबत कार्यवाही करण्यात येत आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कळवा (जि.ठाणे) येथील डॉ.बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय भवनाच्या अपूर्ण बांधकामाबाबत

**(४) १९३६३ (१६-०८-२०१६). ॲड.निरंजन डावखरे : तारांकित प्रश्न क्रमांक १६८५४ ला दिनांक ३१ मार्च, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कळवा (जि.ठाणे) येथील अडीच एकर जागेत सामाजिक न्याय विभागामार्फत डॉ.बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय भवनांच्या बांधकामास शासनाने सन २०११ मध्ये मंजूरी देवून त्यासाठी दिनांक ५ डिसेंबर, २०१३ रोजीच्या शासन आदेशान्वये रुपये ८ लाख इतकी आर्थिक तरतूद केली होती, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर इमारतीच्या जागेची मोजणी, फेरमोजणी, अतिक्रमणे काढणे इत्यादी कारणास्तव प्रलंबित कामे पूर्ण करण्याचे मा.सामाजिक न्याय मंत्री यांनी माहे मे, २०१६ मध्ये घोषित केले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर बांधकामाबाबतची सद्य:स्थिती काय आहे व ते केव्हा पूर्ण करण्यात येणार आहे ?

**श्री.राजकुमार बडोले (०८-०२-२०१९) :** (१) कळवा (जि.ठाणे) येथील सामाजिक न्याय भवनाच्या बांधकामासाठी रुपये ८,००,३६,६६७/- (अक्षरी रूपये आठ कोटी छत्तीस हजार सहाशे सदुसष्ट फक्त) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती.
(२) होय.
(३) सदर वास्तुचे बांधकाम पूर्ण झालेले असून लवकरच इमारत सामाजिक न्याय विभागाकडे हस्तांतरीत करण्याची कार्यवाही पूर्ण होईल.

---

## राज्यात वादळ, गारपीट, अवकाळी पाऊसामुळे मोठ्या प्रमाणात वित्तीय व जिवीत हानी झाल्याबाबत

**(५) २०३३९ (१९-०८-२०१६). श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, श्री.प्रकाश गजभिये, श्री.ख्वाजा बेग, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात मराठवाडा, विदर्भ, कोकण, पश्चिम महाराष्ट्र व उत्तर महाराष्ट्र विभागातील (नागपूर, बुलढाणा, अमरावती, वाशीम, जळगाव व धुळे या जिल्ह्यात) वादळ, गारपीट, अवकाळी पाऊसामुळे मोठ्या प्रमाणात वित्तीय व

जिवीत हानी झाली असल्याचे माहे एप्रिल-मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नागपूर जिल्ह्यात-२, अमरावती जिल्ह्यात-३, जळगाव जिल्ह्यात-१ व धुळे जिल्ह्यात-२ जणांवर वीज पडून मृत्यू झाला असल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने जिल्हानिहाय पाहणी केली आहे काय,
(४) असल्यास, पाहणीचे निष्कर्ष काय आहेत व तद्नुसार वित्तीय नुकसान झालेल्या शेतकऱ्यांच्या तसेच अवकाळी पावसात वृक्ष, घरे पडून व वीज कोसळून मृत झालेल्या मृतांच्या कुटुंबियांना शासनाने आर्थिक मदत करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (११-०१-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) माहे एप्रिल-मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान वीज पडून नागपूर जिल्ह्यात-३, अमरावती जिल्ह्यात-२, जळगाव जिल्ह्यात-३ व धुळे जिल्ह्यात-३ व्यक्तींचा मृत्यू झाला असल्याची बाब निदर्शनास आलेली आहे.
(३) होय.
(४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, दिनांक १३/०५/२०१५ मधील तरतूदीनुसार माहे एप्रिल-मे, २०१६ मध्ये वादळ, गारपीट, अवकाळी पाऊसामुळे नुकसान झालेल्या आपद्ग्रस्तांना व मृत्यू झालेल्या व्यक्तींच्या नातेवाईकांना नियमानुसार मदत देण्यात आलेली आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## १०+२ स्तरावरील माहिती तंत्रज्ञान विषय शिक्षकांच्या सेवा मान्यतेबाबत

**(६) २१५३६ (२३-०८-२०१६). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अनेक उच्च माध्यमिक विद्यालयातील १०+२ स्तरावरील माहिती तंत्रज्ञान विषयाच्या शिक्षकांनी ३ वर्षाचा शिक्षण सेवकाचा कालावधी पूर्ण केला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, त्यांना शासनाने नियमित सेवेत सामावून घेतले नाही, हे ही खरे आहे काय,
(३) तसेच, उच्च माध्यमिक स्तरावरील माहिती तंत्रज्ञान विषय शिक्षकांना वेतनापोटी अनुदानाची तरतूद करण्याबाबत शासनाने माहिती संकलन प्रक्रिया पूर्ण केली, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.विनोद तावडे (१२-०२-२०१९) :** (१), (२) व (३) शासनाच्या दिनांक ५ जुलै, २००१ च्या शासन निर्णयान्वये माहिती तंत्रज्ञान या विषयास वैकल्पिक विषय म्हणून मान्यता देण्यात आली आहे. तसेच सदर विषय शिकविणाऱ्या शिक्षकास रुपये ५०००/- इतके मानधन संस्थेने विद्यार्थ्यांकडून प्राप्त झालेल्या फी मधून अदा करावयाचे आहे. सदर शिक्षक मानधन तत्वावर कार्यरत असल्याने त्यांना शिक्षण सेवक योजना लागू नाही. तसेच सदर शिक्षकांना अनुदान देण्याबाबतचा प्रस्ताव अमान्य करण्यात आला आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पोलीस कर्मचाऱ्यांना विभागांतर्गत परीक्षा घेऊन पदोन्नती देणेबाबत

**(७) २१७३३ (२४-०८-२०१६). श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, ॲड.निरंजन डावखरे, श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील पोलीस विभागांतर्गत परीक्षा घेऊन पोलीस कर्मचाऱ्यांना पोलीस उपनिरीक्षक पदी पदोन्नती देण्याची प्रक्रिया बंद पडल्याने हजारो पोलीस कर्मचारी पदोन्नतीपासून वंचित राहत असल्याची बाब माहे जून, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सन २०१३ मध्ये विभागांतर्गत परीक्षा घेऊन १९०० पोलीस कर्मचाऱ्यांना टप्प्याटप्प्याने पदोन्नती देण्यात आली मात्र त्यानंतर सदर प्रक्रिया बंद करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, विभागांतर्गत परीक्षा घेऊन पोलीस कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्याची वारंवार मागणी केली जात असून पदोन्नतीच्या प्रतिक्षेत असलेल्या पोलीस कर्मचाऱ्यांना पदोन्नती देणेबाबत शासनाची भूमिका काय आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१४-०२-२०१९) :** (१), (२), (३) व (४) हे खरे नाही.

पोलीस विभागात पोलीस उपनिरीक्षकांची एकूण ९६८७ पदे मंजूर आहेत. त्यापैकी २४२२ (२५%) विभागीय अर्हता परीक्षा उत्तीर्ण झालेल्या पोलीस विभागातील उमेदवारांमधून सेवाज्येष्ठतेनुसार भरण्यात येतात.

सन २०१३ मध्ये पदोन्नतीसाठीची विभागीय अर्हता परीक्षा आयोजित करण्यात आली होती. सदर परिक्षेत उत्तीर्ण झालेल्या पोलीस हवालदार/ सहा.पोलीस उपनिरीक्षक यांना सेवाजेष्ठतेनुसार या १९०७ रिक्त पदावर माहे ऑक्टोबर, २०१३ व जुलै, २०१४ या कालावधीत पोलीस उपनिरीक्षक पदावर पदोन्नती देण्यात आली होती. सदर परिक्षेविरुध्द काही उमेदवारांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्र.७६७/१३ व २८४/१४ दाखल केले. सदर याचिकेत महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने शासनाचा दिनांक २९/०६/२०१३ चा शासन निर्णय रद्द करण्याबाबत आदेश दिला होता. शासनाने मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरन यांच्या आदेशाविरुध्द मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे याचिका क्र.४०७८/२०१५ दाखल केली होती. मा.उच्च न्यायालय, खंडपीठ मुंबई यांनी सदर प्रकरणी शासनाच्या बाजूने निर्णय दिलेला आहे. सदर आदेशाच्या अनुषंगाने सन २०१६ पर्यंत रिक्त असलेल्या पदांवर पोलीस उपनिरीक्षक पदावर पदोन्नती देण्यात आली आहे.

विभागीय अर्हता परीक्षा उत्तीर्ण कर्मचाऱ्यांना त्यांच्या कोट्यातील रिक्त असलेल्या पदावर यथायोग्य पध्दतीने पदोन्नती देण्याची कार्यवाही पोलीस महासंचालक, म.रा. मुंबई यांच्यास्तरावर कार्यवाही सुरु आहे.

---

## जळगाव शहरातील जिल्हा परिषदेच्या ६० टक्के शाळांतील अग्निशमन यंत्रणेत गॅस रिफीलिंग नसल्याबाबत

**(८) २२१०९ (२३-०८-२०१६). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जळगाव शहरातील खाजगी शाळांसह जिल्हयातील जिल्हा परिषदेच्या ६० टक्के शाळांतील अग्निशमन यंत्रणेत तब्बल पाच वर्षापासून गॅस रिफीलिंग केले नसल्याचे माहे एप्रिल, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले,

(३) असल्यास, चौकशीनुसार उपरोक्त प्रकरणी कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१२-०२-२०१९) :** (१), (२) व (३) अंशत: खरे आहे. काही शाळांमध्ये गॅस रिफिलिंग केले असून उर्वरित शाळांसंदर्भात शाळा व्यवस्थापन समिती मार्फत गॅस रिफिलिंग करणेबाबत संबंधित गट शिक्षण अधिकारी यांना सूचना दिल्या आहेत.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## औरंगाबाद जिल्हा परिषदेच्या आरोग्य विभागात कंत्राटी पध्दतीने ड्रायव्हरची डबल नावे नोंदवून गैरव्यवहार केल्याबाबत

**(९) २२१७४ (१९-०८-२०१६). श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औरंगाबाद जिल्हा परिषदेच्या आरोग्य विभागात कंत्राटी पध्दतीने ड्रायव्हरची डबल नावे नोंदवून बावीस हजार पाचशे रुपयांचा गैरव्यवहार केल्याचे माहे मे, २०१६ च्या पहिल्या आठवड्यात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार गैरव्यवहार करणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांचेवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१८-०२-२०१९) :** (१) नाही.
(२) नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अकोला येथील अवैध्य गुरांच्या विक्रीबाबत

**(१०) २२३६८ (२२-१२-२०११). श्री.गोपीकिसन बाजोरिया :** सन्माननीय **पणन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अकोला महानगरपालिका हद्दीतील तपे हनुमान मंदिर (अंजनीमाता हनुमान मंदिर) मोहता मिल अकोला येथे कृषी उत्पन्न बाजार समितीच्या परवानगीशिवाय गुरांचा अवैध बाजार सुरु असतो, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, हा अवैध बाजार बंद करण्यासाठी कोणती कार्यवाही करण्यात आली आहे,
(३) सदर बाजारातून कत्तलीसाठी अवैध गोवंशाची विक्री होत असल्याबाबत कृषी उत्पन्न बाजार समिती व जिल्हा प्राणीक्लेश प्रतिबंधक समितीकडून संबंधित विभागाकडे तक्रारी करण्यात आल्या, हे खरे आहे काय,
(४) असल्यास, या तक्रारीवर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२९/०१/२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२) सदर ठिकाणी अनधिकृत गुरे विक्री व्यापार बंद करण्यासंदर्भात मानद सदस्य, जिल्हा प्राणी क्लेश प्रतिबंधक समिती यांनी दिनांक ०२/११/२०१० रोजी कृषी उत्पन्न बाजार समिती, अकोला यांचेकडे तक्रार दाखल केली होती. सदर तक्रारीस अनुसरुन बाजार समितीने दिनांक १०/११/२०१० रोजी रामदासपेठ पोलीस स्टेशन अकोला येथे तक्रार दाखल केली.

तसेच सदर जागेत गुरे अनधिकृत विक्रीचा व्यापार सुरु असल्याचे पोलीस स्टेशन, सिटी कोतवाली, अकोला यांच्या निदर्शनास आल्याने त्यांनी देखील दिनांक २४/०५/२०११ रोजी पोलीस स्टेशन, रामदासपेठ येथे फिर्याद दाखल केली. सदर गुन्ह्यातील आरोपींविरुध्द मा.न्यायालयात दोषपत्र सी.सी.नं. ७३७/२०११ दाखल असून सद्य:स्थिती सदर प्रकरण न्यायप्रविष्ट आहे.

(३) व (४) हे खरे आहे.

सदर जागेमध्ये होत असलेल्या अनधिकृत गुरे विक्री व्यापार बंद करणेबाबत अकोला कृषी उत्पन्न बाजार समितीने पोलीस स्टेशन, रामदासपेठ, अकोला येथे दिनांक १०/११/२०१० रोजी तक्रार दाखल केली. वर नमूद केल्याप्रमाणे सदर प्रकरण न्यायप्रविष्ट आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## वैतरणा (जि.पालघर) येथील रेल्वे पुलाच्या दुरूस्तीबाबत

**(११) २२५७३ (१६-०८-२०१६). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर : तारांकित प्रश्न क्रमांक ४०८९ ला दिनांक १३ मार्च, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वैतरणा (जि.पालघर) येथील वैतरणा गावात व इतर परिसराला जोडणारा रेल्वे पुल धोकादायक व जीर्ण झाला असून सदर पुलाच्या दुरुस्तीची मागणी तेथील ग्रामस्थांनी शासनाकडे दिनांक २८ मे, २०१६ रोजी वा त्यासुमारास केली असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणाची शासनाने चौकशी करुन सदर पुलाच्या दुरुस्तीसाठी निधी उपलब्ध होण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (०६-०२-२०१९) :** (१) व (२) प्रस्तुत प्रश्नात विचारणा केलेली बाब ही केंद्रीय रेल्वे मंत्रालयाशी संबंधित आहे. पश्चिम रेल्वे विभागाने प्रत्येक वर्षी पुलांचे निरीक्षण करुन आवश्यकता असल्यास पुलांची दुरुस्ती करण्यात येत असल्याचे राज्य शासनास कळविलेले आहे. यासंदर्भात राज्य शासनाने दिनांक २८ जानेवारी, २०१९ च्या पत्रान्वये पश्चिम रेल्वेस सदर पुलाबाबत स्वतंत्रपणे निरीक्षण करुन कार्यवाही करण्याबाबत कळविले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

___________

## राज्यात परिचारिकांच्या संख्येत वाढ करण्याबाबत

**(१२) २५६०३ (१६-१२-२०१६). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे, श्री.रविंद्र फाटक, श्री.जयंत पाटील, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात परिचारिकांची संख्या अपुरी असल्याचे माहे सप्टेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, एक हजार नागरिकांमागे डॉक्टरांची संख्या ०.७ तर परिचारिकांची संख्या १.०७ असल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, परिचारिकांची वाढती मागणी पाहता परिचारिकांच्या संख्येत वाढ करण्याच्यादृष्टीने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (१९-०१-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२) हे खरे नाही.
(३) आरोग्य संस्थांच्या संख्येत वेळोवेळी वाढ होत असून त्यानुसार अधिपरिचारीकांच्या संख्येतही वेळोवेळी वाढ करण्यात येत आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

___________

## नंदुरबार जिल्हा परिषदेची रिक्त पदे भरण्याबाबत

**(१३) २८९८२ (१५-०४-२०१७). श्री.चंद्रकांत रघुवंशी** : सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नंदुरबार जिल्हा परिषदेची वर्ग १, २ व ३ ची अंदाजे २०० हून अधिक रिक्त पदे आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त पदे भरण्याबाबत वेळोवेळी निवेदन देऊनही कार्यवाही केली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन जिल्हा परिषदेमध्ये कामावर परिणाम होत असल्याने रिक्त पदे त्वरीत भरण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१२-०२-२०१९)** : (१), (२) व (३) नंदुरबार जिल्हा परिषदेतील वर्ग-१ संवर्गातील ५८ व वर्ग-२ संवर्गातील ४५ पदे रिक्त आहेत. तसेच वर्ग-३ संवर्गातील १२२८ पदे रिक्त आहेत.

महाराष्ट्र विकास सेवा वर्ग-१ व वर्ग-२ ची पदे भरण्याबाबत शासनस्तरावरून कार्यवाही सुरू आहे.

महाराष्ट्र विकास सेवा वगळून जिल्हा परिषदेतील इतर वर्ग-१ व वर्ग-२ ची पदे संबंधित प्रशासकीय विभागामार्फत निर्माण करण्यात आली असून सदर पदे संबंधित विभागाकडून भरली जातात. जिल्हा परिषदेतील अधिकाऱ्यांची सर्व रिक्त पदे तात्काळ भरण्याबाबत संबंधित प्रशासकीय विभागांना वेळोवेळी सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

तसेच, जिल्हा परिषदेतील “क” संवर्गातील रिक्त पदे शासनस्तरावर सरळसेवेद्वारे ऑनलाईन पध्दतीने व क्षेत्रियस्तरावर पदोन्नतीद्वारे भरण्याबाबत कार्यवाही सुरू आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नांदेड येथील आयुर्वेद महाविद्यालयातील रस शाळेबाबत

**(१४) ३०४४७ (१७-०४-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कार्यक्रमानिमित्त आलेल्या आयुष विभागाच्या राज्याच्या संचालकांना एकेकाळी नांदेड येथे प्रसिध्द असलेल्या आयुषच्या रस शाळेस भेट देण्यात स्वारस्य नसल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१५-०२-२०१९) :** (१) हे खरे नाही.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पालघर जिल्हा परिषदेमार्फत महिलांच्या सर्वांगीण विकासासाठी विविध योजना कार्यान्वित करणेबाबत

**(१५) ३०९२६ (११-०८-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, ॲड.निरंजन डावखरे, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पालघर जिल्हा परिषदेच्या जिल्हा नियोजन समितीने महिलांच्या सर्वांगीण विकासासाठी व आर्थिक उन्नतीसाठी सन २०१७-१८ च्या जिल्हा परिषदेच्या अर्थसंकल्पात महिलांसाठी खास भरीव निधीची तरतूद करून त्यात विविध योजनांचा समावेश करून महिलांचे सक्षमीकरण करण्याचा कार्यक्रम कार्यान्वित केल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर कार्यक्रमांतर्गत महिलांच्या सर्वांगीण विकासासाठी कोणकोणत्या योजना राबविण्यात येत आहे व त्यांच्या अंमलबजावणीची सद्य:स्थिती काय आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१३-०२-२०१९) :** (१) व (२) होय.

जिल्हा परिषदेच्या सन २०१७-१८ च्या अर्थसंकल्पामधून महिला व बाल कल्याण विभागामार्फत महिलांच्या सर्वांगीण विकासासाठी, महिला लोकप्रतिनिधींचा प्रशिक्षण अभ्यासदौरा आयोजित करणे, शाळेत जाणाऱ्या मुलींना दोनचाकी सायकल पुरविणे, ७ वी ते १२ वी पास मुलींना संगणक प्रशिक्षण देणे, किशोरवयीन मुलींना लैंगिक शिक्षण व जीवन कौशल्याचे प्रशिक्षण देणे, कायदेविषयक सल्ला देणे, मराठी व इंग्रजी टंकलेखन प्रशिक्षण देणे, परिचारीका प्रशिक्षण इत्यादी योजना राबविण्यात आल्या आहेत. वैयक्तिक लाभाच्या योजना राबवितांना पात्र लाभार्थ्यांची निवड करून लाभार्थ्यांनी वस्तू खरेदी केल्यानंतर त्यांच्या बँक खात्यावर अनुदान जमा करण्यात आले आहे.
(३) प्रश्नच उद्भवत नाही.

---

## राज्यातील प्रलंबित रेल्वे प्रकल्पांबाबत

**(१६) ३१६४४ (०७-०८-२०१७). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.रामहरी रुपनवर : तारांकित प्रश्न क्रमांक २७७६७ ला दिनांक १७ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईसह राज्यातील अनेक रेल्वे प्रकल्प गेल्या अनेक वर्षांपासून रखडलेले असून या रेल्वे प्रकल्पांना गती मिळावी, याबाबत चर्चा करुन निर्णय घेण्यासाठी मा.मुख्यमंत्री व मा.केंद्रीय रेल्वे मंत्री यांच्या उपस्थितीत सर्व संबंधितांची मुंबई येथे दिनांक १८ एप्रिल, २०१७ रोजी उच्चस्तरीय बैठक आयोजित करण्यात आली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त बैठकीत राज्यातील कोणत्या रेल्वे प्रकल्पांबाबत आढावा घेण्यात आलेला आहे व त्यासाठी येणाऱ्या खर्चाचे नियोजन कशाप्रकारे करण्यात येणार आहे, रेल्वे प्रकल्प पूर्ण होण्याबाबत कोणते निर्णय घेतले आहेत व त्याची अंमलबजावणी करून रेल्वे प्रकल्प किती कालावधीत पूर्ण होणार आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने राज्यातील रेल्वे प्रकल्प पूर्ण करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (०६-०२-२०१९) :** (१) होय.
(२) व (३) सदर बैठकीमध्ये बेलापूर-सीवुडस-उरण नवीन उपनगरीय रेल्वे मार्ग, एमयुटीपी दोन आणि तीन प्रकल्प, छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनस ते पनवेल उन्नत मार्ग, वांद्रे-विरार उन्नत मार्ग, अहमदनगर-बीड-परळी वैजनाथ प्रकल्प, वर्धा-नांदेड प्रकल्प, कराड-चिपळूण, जयगड बंदर रेल्वे जोडणी, वडसा-देसाईगंज रेल्वे मार्ग, नागपूर नागभीड रेल्वे मार्ग इ. विविध रेल्वे मार्गाची अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने विविध निर्णय घेण्यात आले आहेत.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## महानगरपालिका क्षेत्रातील सफाई कामगारांच्या होणाऱ्या मृत्यूबाबत

**(१७) ३१७६४ (१०-०८-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, ॲड.राहुल नार्वेकर, ॲड.निरंजन डावखरे, ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महानगरपालिका क्षेत्रातील गटारांच्या सफाई कामासाठी मॅनहोलमध्ये सुरक्षेशिवाय काम करताना कामगारांच्या होणाऱ्या मृत्यूबाबत प्रधान सचिव, नगरविकास विभाग यांना दिनांक १५ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास लोकप्रतिनिधीने मागण्याचे निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, निवेदनातील मागण्यांचे स्वरुप काय आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (११-०२-२०१९) :** (१) व (२) अशा प्रकारचे निवेदन प्राप्त झाले होते.

सदर निवेदनान्वये गटारे व मॅनहोल मधील गाळ काढण्यासाठी यंत्रे वापरण्याबाबत स्थानिक स्वराज्य संस्थाना बंधनकारक करावे अशी विनंती करण्यात आली होती.

तसेच २०१६-२०१७ या वर्षात मॅनहोलमध्ये गुदमरुन मृत्यू पावलेल्या कामगारांच्या करण्यात आलेल्या मदतीबाबत विचारणा करण्यात आली होती.
(३) मलवाहिनीची सफाईचे काम करण्यासाठी यंत्रसामग्रीचा वापर करण्यात येतो.

तसेच, अत्यंत तातडीच्या प्रसंगी कामगाराकडून हे काम करावे लागल्यास सदर कामगारास आवश्यक ती सुरक्षिततेची साधने पुरविण्यात येतात.

नांदेड महानगरपालिकाच्या कार्यक्षेत्रात सन २०१६-२०१७ मध्ये एका मजूराचा मृत्यू झाला होता.

त्यांचे कुटूंबियाना संबंधित ठेकेदारामार्फत रुपये दहा लक्ष ची मदत देण्यात आली असे नांदेड महानगरपालिकेने कळविले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुणे जिल्हयातील आदिवासी विभागाच्या शाळांचे थकीत वेतन अदा करण्याबाबत

**(१८) ३४२९४ (१९-०८-२०१७). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुणे जिल्हयातील आदिवासी भागातील माध्यमिक शाळांमधील शिक्षक/कर्मचाऱ्यांचे सन २०१०-२०११ या वर्षातील काही महिन्यांची वेतन देयके थकीत असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त थकीत वेतन देणेबाबत लोकप्रतिनिधींनी मा.आदिवासी विकास मंत्री यांना दिनांक १७ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास लेखी निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर शाळांना थकीत वेतन देणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१४-०२-२०१९) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.
(३) सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात मार्च अखेरीस उपलब्ध अनुदानातून रक्कम रुपये ६९७२ हजाराची (सहा कोटी सत्याण्णव लक्ष वीस हजार इतकी) तरतूद पुणे जिल्हयास उपलब्ध करुन देण्यात आली होती. तसेच सन २०१८-१९ मध्ये रक्कम रुपये १००२५ हजाराची (एक कोटी पंचवीस हजार) ची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पालघर जिल्हयात पोषण आहार योग्य पध्दतीने मिळत नसल्याने आदिवासी माता आणि मुलांची गैरसोय होत असल्याबाबत

**(१९) ३६५०० (०२-०१-२०१८). श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पालघर जिल्हयात पोषण आहार योग्य पध्दतीने मिळत नसल्याने आदिवासी माता आणि मुलांची गैरसोय होत असल्याने हजारो आदिवासींनी दिनांक २ ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास पोलीस अधीक्षक पालघर कार्यालयावर मोर्चा काढला असून मागण्यांचे निवेदन जिल्हा पोलीस अधीक्षक यांना दिले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, निवेदनामध्ये दिलेल्या मागण्यांचे स्वरुप काय आहे,

(३) असल्यास, उक्त निवेदनाच्या अनुषंगाने शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१२-०२-२०१९) :** (१) होय.
(२) शूर झलकारी कातकरी एकता महासंघ ठाणे यांच्या निवेदनामध्ये कातकरी समाजाच्या विकासाशी संबंधित विविध योजना राबविणे व या समाजाला मुख्य प्रवाहात आणणे असे स्वरुप आहे.
(३) कुपोषण व बालमृत्यू रोखण्यासाठी विविध उपाययोजना राबविण्यात येत आहे. याअंतर्गत बाल उपचार केंद्र, पोषण पुनर्वसन केंद्र, ग्राम बालविकास केंद्र कार्यान्वित आहेत. जिल्हयामध्ये भारतरत्न डॉ.ए.पी.जे.अब्दुल कलाम अमृत आहार योजना विस्तारीत व टप्पा २ राबविण्यात येत आहे. जिल्हास्तरावर उपलब्ध नियमित बालरोग तज्ञांमार्फत सॅम व मॅम श्रेणीतील तसेच इतर आजारी मुलांची नियमित आरोग्य तपासणी करुन आवश्यक उपचार दिले जातात. राजमाता जिजाऊ मिशन व रिलायन्य फाऊंडेशन यांचेमार्फत जिल्हयातील एकूण ४२ अंगणवाडी केंद्रांमध्ये परासबागा विकसित करण्यात आल्या आहेत. किशोरवयीन मुलींना आरोग्यविषयक व जीवन कौशल्य संदर्भात प्रशिक्षण देण्यात आले आहे. पाककृती प्रात्याक्षिके/स्पर्धा आयोजित करणे, स्थानिक भाज्यांचे रानभाज्यांचे प्रदर्शनातून महत्व पटवून देण्यात येत आहे. स्तनपान सप्ताह आयोजित करणे, अंगणवाड्यांमध्ये विविध सण साजरे करणे, बालिकादिन, मातृदिन, महिला दिन तसेच विविध दिनविशेष साजरा करण्यात येतात. तसेच जिल्हयातील विविध कंपनींची व स्वयंसेवी संस्थांची मदत घेऊन कुपोषणाचे प्रमाण आटोक्यात आणण्यासाठी वेळोवेळी त्यांच्या सभा आयोजित करण्यात येवून लाभार्थ्यांना अधिक मदत मिळावी यासाठी प्रयत्न करण्यात येत आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## जिल्हा परिषद लेखा संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या मागण्यांबाबत

**(२०) ३६६५५ (०२-०१-२०१८). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जिल्हा परिषद लेखा संवर्गातील कर्मचाऱ्यांना शासकीय कर्मचाऱ्यांप्रमाणे राजपत्रित अधिकाऱ्यांचा दर्जा मिळावा, ग्रेड-पे मिळणे, महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजना व इंदिरा आवास योजनांतर्गत पंचायत समितीस्तरावर सहायक लेखा अधिकारी पद निर्माण करणे, लेखा लिपिक परिक्षा, जिल्हा कोषागार/उपकोषागार कार्यालयाप्रमाणे गट स्तरावर (पंचायत समिती स्तरावर) लेखा विभागाचे कामकाज करण्यात यावे, महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा वर्ग-३ ची परीक्षा दरवर्षी नियमित घेणे आदि व अन्य मागण्यांबाबत दिनांक १५ मार्च, २०१७ रोजी वा त्यासुमारास महाराष्ट्र जिल्हा परिषद लेखा कर्मचारी संघटना,उस्मानाबाद यांनी निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१८-०२-२०१९) :** (१) होय.

(२) व (३) या संदर्भात नुकतीच नागपूर येथे पावसाळी अधिवेशनात संबंधित कर्मचाऱ्यांच्या संघटनेची बैठक झाली होती त्या बैठकीत निश्चित केल्यानुसार पुढील कार्यवाही करण्यात येत आहे.

---

## रत्नागिरी शहरानजीकच्या सागरी महामार्गावरील वाहतूक कोंडीचा प्रश्न सोडविण्याबाबत

**(२१) ३८२६६ (०६-०४-२०१८). श्री.प्रसाद लाड :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रत्नागिरी शहरानजीकच्या शिरगाव रेशन दुकान ते उर्दू शाळा येथे सागरी महामार्गावर मोठ्या प्रमाणात वाहतूक कोंडी होत असल्याने नागरिकांना त्रास होत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याचा परिणाम पर्यटन व्यवसायावर होत असल्याने उक्त वाहतूक कोंडीचा प्रश्न सोडविण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०८-०१-२०१९) :** (१) व (२) होय, हे अंशत: खरे आहे.

प्रश्नाधीन रत्नागिरी शहरानजीकच्या शिरगांव गावातील अस्तित्वातील रस्ता अरुंद असल्यामुळे वाहतूक कोंडी होते. त्याकरीता वळण रस्त्याचे बांधकाम करण्याचे काम सन २०१५ मध्ये अर्थसंकल्पात मंजूर होते. तथापि, सदर कामाला स्थानिक रहिवाश्यांनी सहकार्य न केल्यामुळे सदर काम सुरु होऊ शकले नाही.

सदर रस्त्याला पर्यायी मार्ग काळबादेवी ते मिऱ्या दरम्यान असणाऱ्या खाडीवर मोठा पूल बांधून रस्ता, राष्ट्रीय महामार्गाला जोडणे असा आहे. या पुलाच्या बांधकामाचा प्रस्ताव मुख्य अभियंता (पी-६), दळणवळण व महामार्ग मंत्रालय, नवी दिल्ली यांचेकडे केंद्रिय मार्ग निधी योजनेंतर्गत मंजूरीसाठी मुख्य अभियंता, मुंबई प्रादेशिक विभाग यांचेमार्फत दिनांक ३/११/२०१५ रोजी सादर करण्यात आला आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात बालमृत्यू व बालविकास प्रकल्प अधिकारी मुख्यसेविका, अंगणवाडी सेविका, मिनी अंगणवाडी सेविका व मदतनीसांची पदे भरण्याबाबत

**(२२) ३९१७१ (०४-०४-२०१८). श्री.प्रकाश गजभिये, श्री.हरिसिंग राठोड : तारांकित प्रश्न क्रमांक ३५७८३ ला दिनांक १८ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) एकात्मिक बालविकास सेवा योजनेच्या अहवालानुसार राज्यात सन २०१७ मध्ये हजारो बालकांचा मृत्यू झाला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्याची कारणे काय आहेत,

(३) तसेच राज्यातील बालविकास प्रकल्प अधिकारी मुख्यसेविका, अंगणवाडी सेविका, मिनी अंगणवाडी सेविका व मदतनीसांची दहा हजार पेक्षा जास्त पदे रिक्त आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, बालमृत्यू व रिक्त पदे भरण्याकरीता शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१२-०२-२०१९)** : (१) एकात्मिक बालविकास सेवा योजनेच्या अहवालानुसार राज्यातील सन २०१७ मध्ये अंगणवाडी केंद्रातील बालमृत्यूची माहिती खालीलप्रमाणे आहे.

| कालावधी | एकूण जिवंत जन्म | ०-१ वर्ष बाल मृत्यू | १ ते ५ वर्ष मृत्यू |
|---|---|---|---|
| जानेवारी ते डिसेंबर, २०१७ | ८१०१२२ | १११६४ | ३५८४ |

(२) बालमृत्यू विविध आजार व संसर्गजन्य आजार इत्यादीमुळे झालेले आहेत. उदा. १) निमोनिया, २) दुर्धर आजाराने, ३) तिव्र तापाने, ४) मलेरीया, ५) गोवर, ६) जुळे जन्म, ७) अपुऱ्या दिवसाची प्रसुती, ८) जन्मत:कमी वजन, ९) अतिसार, १०) सिकलसेल, ११) अस्थमा, १२) श्वासावरोध, १३) टि.बी., १४) कावीळ, १५) डेंग्यूमलेरिया, १६) मेंदुज्वर, १७) रक्तक्षय (ॲनिमिया), १८) धनुर्वात, १९) डांग्याखोकला इत्यादी.

(३) व (४) माहे जून, २०१८ च्या मासिक प्रगती अहवालानुसार राज्यातील एकात्मिक बालविकास प्रकल्प अधिकारी (वर्ग-१) व (वर्ग-२) यांची रिक्त पदे भरण्याबाबत कार्यवाही सुरु आहे. तसेच अंगणवाडी सेविका/मिनी अंगणवाडी सेविका/मदतनीस यांची रिक्त पदे ही अंगणवाड्यांचे एकत्रिकरण झाल्याशिवाय भरती करण्यात येवू अशा सूचना दिनांक ०७/०९/२०१७ च्या पत्रान्वये आयुक्त, एकात्मिक बालविकास सेवा योजना, नवी मुंबई यांना देण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार कार्यवाही सुरु आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नागपूर जिल्हा परिषदेच्या आरोग्य विभागातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(२३) ३९५७३ (०४-०४-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे : तारांकित प्रश्न क्रमांक ३५१५६ ला दिनांक ११ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर जिल्हा परिषदेच्या आरोग्य विभागातील अनेक पदे रिक्त असल्याने त्याचा त्रास रुग्णांना सहन करावा लागत असल्याची बाब माहे डिसेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, आरोग्य विभागात अनेक पदे रिक्त असल्याने कार्यरत असलेल्या डॉक्टर्स आणि कर्मचाऱ्यांवर अतिरिक्त कामाचा ताण पडत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर रिक्त पदे भरण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१२-०२-२०१९) :** (१) नाही.

(२) नाही.

(३) व (४) शासनाने दिनांक १६/०५/२०१८ च्या शासन निर्णयान्वये पदभरतीवरील निर्बंध काढून टाकल्याने त्याप्रमाणे जिल्हा परिषदेकडील गट-क संवर्गातील रिक्त पदे भरण्याची कार्यवाही सुरु आहे.

---

## अहमदनगर जिल्हयात बोंडअळीमुळे नुकसानग्रस्त कापुस उत्पादक शेतकऱ्यांना मदत देण्याबाबत

**(२४) ३९८०५ (०५-०४-२०१८). श्री.हेमंत टकले, श्री.विक्रम काळे, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.ख्वाजा बेग, श्री.रामराव वडकुते, श्री.जगन्नाथ शिंदे, ॲड.निरंजन डावखरे : तारांकित प्रश्न क्रमांक ३५४२० ला दिनांक १९ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अहमदनगर जिल्ह्यात एक लाख पंचवीस हजार हेक्टरवर पेरणी झालेल्या कापसावर बोंडअळीमुळे नुकसान झालेल्या कापसाच्या क्षेत्रावरील पंचनामे करण्याचे सुरु असलेले काम पूर्ण झाले आहे काय,
(२) असल्यास, पंचायत समिती निहाय किती हेक्टर क्षेत्रावरील एकूण किती गावातील शेतकऱ्यांच्या शेतावरील कापूस पिकांचे पंचनामे पूर्ण करण्यात आले आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन किती शेतकऱ्यांना नुकसान भरपाई पोटी प्रतिहेक्टर किती नुकसान भरपाई देण्यात आली वा येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१६-०२-२०१९) :** (१) होय.
(२) अहमदनगर जिल्ह्यातील एकूण १३ पंचायत समितीतील १०८५ गावांचे १४२७३५.९५ हेक्टर क्षेत्राचे १९७३४२ शेतकऱ्यांचे पंचनामे करण्यात आलेले आहेत.
(३) खरीप २०१७ मध्ये बोंडअळीच्या प्रादुर्भावामुळे कापूस पिकाच्या झालेल्या नुकसानीसाठी बाधित झालेल्या शेतकऱ्यांना शासन निर्णय, दिनांक ०९/०५/२०१८, दिनांक १२/०७/२०१८ व दिनांक ०१/११/२०१८ अन्वये ३ टप्प्यांमध्ये एकूण रुपये १२१२९.२८ लक्ष एवढी मदत वितरीत करण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील जिल्हा परिषद शाळेतील प्राथमिक डिमट्रेंड शिक्षकांना चौथ्या वेतन आयोगाची सुधारित वेतनश्रेणी देण्याबाबत

**(२५) ३९८२६ (०४-०४-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण : तारांकित प्रश्न क्रमांक ३०२०४ ला दिनांक ३० मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील जिल्हा परिषद शाळेतील प्राथमिक डिमट्रेंड शिक्षकांना चौथ्या वेतन आयोगाची सुधारित वेतनश्रेणी व १८ वर्षे पूर्ण केलेल्या शिक्षकांना निवडश्रेणीच्या रुपाने सुधारित वेतनश्रेणी देण्याबाबत मा.उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाने दिनांक १३ फेब्रुवारी, २०१४ रोजी वा त्यासुमारास निर्णय दिला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१४-०२-२०१९) :** (१) व (२) मा.उच्च न्यायालयाने दिनांक १३/०२/२०१४ रोजी जुलै १९७२ पुर्वी नियुक्त झालेल्या शिक्षकांना डिमट्रेंड समजून प्रशिक्षित शिक्षकांची वेतनश्रेणी देण्याबाबत आदेश पारित केलेले आहेत. या निर्णयाविरुध्द मा.उच्च न्यायालयात पुनर्विलोकन याचिका दाखल करण्यात आलेली आहे.

सदर प्रकरणी अवमानाची कार्यवाही टाळण्याच्यादृष्टीने मा.न्यायालयाच्या निर्णयाची अंमलबजावणी करणे आवश्यक असल्याने याचिकाकर्त्यांना मा.न्यायालयाने निर्देशित केल्यानुसार आर्थिक लाभ, मा.न्यायालयातील दाखल पुनर्विलोकन याचिका व मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधिन राहून दिलेले आहेत. सद्य:स्थितीत प्रकरण न्यायप्रविष्ट आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात बेघर कुटुंबांना इंदिरा आवास व रमाबाई आवास आदी योजनांसाठी घालण्यात आलेल्या जाचक अटींबाबत

**(२६) ४०२५६ (०४-०४-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात बेघर कुटुंबांना इंदिरा आवास व रमाबाई आवास आदी योजनांसाठी घालण्यात आलेल्या जाचक अटींमुळे मोठ्या प्रमाणात लाभार्थींना योजनेचा लाभ घेता येत नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने बेघर कुटुंबांना इंदिरा आवास व रमाबाई आवास आदी योजनेसाठी घालण्यात आलेल्या अटी रद्द करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (११-०२-२०१९) :** (१) हे खरे नाही.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील माध्यमिक शाळांमध्ये शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या भरतीस मान्यता देण्याबाबत

**(२७) ४०८७९ (०५-०४-२०१८). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील माध्यमिक शाळांमध्ये शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या भरतीस बंदी असल्यामुळे माध्यमिक शाळांमध्ये लिपिक व शिपायांची सर्वच पदे रिक्त आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त माध्यमिक शाळेत कमीत कमी एक लिपिक व एक शिपायाचे पद भरण्याबाबतचा प्रस्ताव शासनाकडे बऱ्याच कालावधीपासून प्रलंबित आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर प्रस्तावास मान्यता देण्यासंदर्भात कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०२-०२-२०१९) :** (१), (२), (३) व (४) राज्यातील मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांकरीता शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी सुधारित आकृतिबंधाचा शासन निर्णय, दिनांक २८/०१/२०१९ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

---

## आर-इन्फ्रा-डी या वीज वितरण कंपनीने वीज ग्राहकांकडून कोट्यावधी रुपये नियमबाह्यपणे वसूल केल्याबाबत

**(२८) ४१२४७ (१४-०६-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.किरण पावसकर : तारांकित प्रश्न क्रमांक ३७६७६ ला दिनांक ५ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आर-इन्फ्रा-डी या वीज वितरण कंपनीने मुंबई, मुंबई उपनगर तसेच मिरा भाईंदर परिसरातील वीज ग्राहकांकडून कोट्यावधी रुपये नियमबाह्यपणे वसूल केल्याची बाब निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या कंपनीने वीज पुरविण्यासाठी जमिनीत टाकलेल्या केबलचा मोबदला वसूल करण्याची परवानगी MERC कडून देण्यात आली परंतु या कंपनीने किती मिटर व किती किंमतीची केबल जमिनीत टाकली याबाबतची कोणतीही माहिती MERC कडे उपलब्ध नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, केबलवर किती खर्च करण्यात आला याबाबतची माहिती MERC कडे नसल्यास वसूलीची रक्कम व कालावधी कशाच्या आधारे ठरविण्यात आली,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुसार या कंपनीने नियमबाह्यपणे ग्राहकांकडून घेतलेली हजारो कोटीची रक्कम शासन वसूल करणार आहे काय, याबाबत सक्षम यंत्रणेमार्फत चौकशी केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (०२-०७-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही. विद्युत अधिनियम, २००३ नुसार महाराष्ट्र वीज नियामक आयोग वीज वितरण कंपन्याकडून प्राप्त वीज दर याचिकेच्या अनुषंगाने वीज दर निश्चित करते. याचिकेत विविध कामे जसे की केबल टाकणे, मीटर बसविणे, नविन उपकेंद्रे स्थापित करणे याकरीता होणारा खर्च समाविष्ट असतो. सदर याचिकेवर ग्राहकांकडून प्राप्त होणाऱ्या सूचना व हरकती तसेच विद्युत अधिनियम व विनियमातील तरतूदीचा विचार करून वीज दर निश्चित करतात व त्यानुसार वीज वितरण कंपन्या ग्राहकांकडून विजेच्या बिलाची वसुली करतात.

रिलायन्स इन्फ्रास्ट्रक्चरद्वारा महाराष्ट्र वीज नियामक आयोगापुढे सादर करण्यात आलेल्या सन २०१६-१७ ते सन २०१९-२० या वर्षाकरीताच्या बहुवर्षीय वीज दर याचिकेत ४१८६ किलोमीटर HT केबल, ५९३८ किलोमीटर LT केबल, ११३५३ किलोमीटर सर्व्हिस लाईन केबल याचा समावेश केला असून त्याबाबत विहीत कार्यपध्दती अवलंबून महाराष्ट्र वीज नियामक आयोगाद्वारे वीज दर निश्चित करताना एकूण रुपये ४८८.२० कोटी इतक्या रकमेचा केबल व्यवसायापोटीचा भांडवली खर्च अनुज्ञेय ठरविला आहे.

(३), (४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई महापालिकेने अतिधोकादायक इमारतींचा पुनर्विकास करण्याबाबत

**(२९) ४१३८७ (०२-०८-२०१८). श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.आनंद ठाकूर, श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील अतिधोकादायक इमारतींचे सर्वेक्षण महापालिकेने केले असून महिनाभरात त्यांची यादी जाहीर होणार असल्याची बाब माहे एप्रिल, २०१८ च्या तिसऱ्या सप्ताहात निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मुंबईतील अनेक प्रकल्पांतर्गत इमारतींचा पुनर्विकास १५ ते २० वर्षापासून प्रलंबित असून शासनामार्फत पुनर्विकासाचे ठोस किंवा लेखी आश्वासन मिळत नसल्याने अनेक रहिवासी इमारत रिकामी करण्यास नकार देत आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची करणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१२-०२-२०१९) :** (१) दिनांक १५/०५/२०१८ पर्यंत महानगरपालिकेमार्फत करण्यात आलेल्या सर्वेक्षणामध्ये सी-१ प्रवर्गामधील अतिधोकादायक व मोडकळीस आलेल्या एकूण ६१९ इमारती आढळून आल्या आहेत.

(२), (३), व (४) इमारतीच्या पुनर्बांधकामाच्या कालावधीविषयी भाडेकरुंना निश्चित अशी हमी दिली जात नसल्यामुळे भाडेकरु अशा धोकादायक इमारती रिकामी करत नाहीत, याकरीता त्यांच्या निवाऱ्याचे संरक्षण व सुरक्षा सुनिश्चित करण्यासाठी मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या कलम ३५४ व त्यानुषंगाने कलम ४९९ मध्ये सुधारणा करुन नवीन पोटकलम ३ ते ६ दाखल करण्यात आलेली आहेत.

सी-१ प्रवर्गातील इमारतींवार मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या कलम ३५४ अन्वये महानगरपालिकेमार्फत खालीलप्रमाणे कारवाई करण्यात आली/येत आहे-

१) ४३ इमारती निष्कासित करण्यात आल्या आहेत.
२) ६२ इमारती रिकाम्या करण्यात आल्या आहेत.
३) रिकाम्या करण्यात आलेल्या इमारतींपैकी ८ प्रकरणे न्यायप्रविष्ट आहेत.
४) ४८ प्रकरणे तांत्रिक सल्लागार समितीकडे पाठविण्यात आली आहेत.
५) १३२ इमारतींची जल व विद्युतजोडणी खंडीत करण्यात आली आहे.
६) १६० प्रकरणांमध्ये जल व विद्युतजोडणी खंडीत करणे व इमारत रिकामी करण्याबाबत कारवाई सुरु आहे.

७) १८७ इमारतींची प्रकरणे न्यायप्रविष्ट असून त्यापैकी १५७ प्रकरणांमधील इमारतींबाबत दुर्घटना घडल्यास बृहन्मुंबई महानगरपालिका जबाबदार राहणार नसल्याबाबतचे प्रतिज्ञापत्र न्यायालयात सादर केले आहे.

---

## जव्हार (जि.पालघर) तालुक्यातील आदिवासी आश्रमशाळांच्या अतिरिक्त तुकड्यांना मान्यता मिळणेबाबत

**(३०) ४२१५९ (२८-०६-२०१८). श्री.बाळाराम पाटील, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जव्हार (जि.पालघर) तालुक्यातील आदिवासी दुर्गम भागात राज्य शासनाच्या आदिवासी विकास विभागांतर्गत अनुदानित आश्रमशाळा सुरु करण्यात आल्या असून आठवी तुकडीपर्यंत मान्यता असलेल्या शाळांना इयत्ता ९ वी व १० वी करीता प्रलंबित असलेली अतिरिक्त तुकडी मंजूर करण्याबाबत तेथील विद्यार्थी व पालकांनी मागणी केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, आदिवासी भागात शिक्षण घेणारे गोरगरीब विद्यार्थी शिक्षणापासून वंचित राहू नयेत यासाठी शासन अतिरिक्त तुकडीस मंजुरी देणेबाबत कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (१६-०७-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) राज्यातील २७ शासकीय व १७ अनुदानित आश्रमशाळांमध्ये ८ वी ते १० वी चे वर्ग सुरु करण्याचे तसेच १५ शासकीय व २७ अनुदानित आश्रमशाळांमध्ये इयत्ता ११ वी व १२ वी चे विज्ञान व कला शाखेचे वर्ग सुरु करण्याचा प्रस्ताव मंत्रिमंडळापुढे आणण्यासाठी वित्त विभागास सादर केला आहे. आदिवासी विकास विभागांतर्गत अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे विभागात प्रकल्प अधिकारी जव्हार अंतर्गत एकूण १८ आश्रमशाळा कार्यरत असून त्यापैकी जव्हार तालुक्यात जव्हार, चालतवाड, चांभारशेत, हिरडपाडा व

वावर या ५ अनुदानित आश्रमशाळा कार्यरत आहेत. सदर शाळांपैकी हिरडवपाडा या आश्रमशाळेचा अतिरिक्त तुकडी वाढीचा प्रस्ताव अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे कार्यालयास प्राप्त झाला होता. परंतु सदर प्रस्ताव परिपूर्ण नसल्याने त्रुटींची पुर्तता करण्यासाठी प्रकल्प अधिकारी, जव्हार यांच्याकडे परत पाठविण्यात आला. इतर कोणत्याही शाळेचा अतिरिक्त तुकडीवाढीचा प्रस्ताव शासनास प्राप्त झालेला नाही.

तसेच आदिवासी विद्यार्थी शिक्षणापासून वंचित राहू नये याकरीता उपलब्धतेनुसार इतर शासकीय व अनुदानित आश्रमशाळांमध्ये विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात येतो.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात नियमांचे उल्लघंन करुन रिक्षा वाहतूक करणाऱ्यांवर कारवाई करण्याबाबत

**(३१) ४२१८६ (०२-०८-२०१८). आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.सुभाष झांबड, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील रिक्षाचालकांना शिस्त लागावी आणि प्रवाशांना सुरक्षित रिक्षाप्रवास करता यावा याकरीता प्रादेशिक परिवहन कार्यालयाने रिक्षाचालकांना अनेक नियम आखून दिले असतानाही रिक्षाचालकांकडून नियमांचे उल्लघंन करुन रिक्षा चालवित असल्याने त्याचा प्रवाशांना त्रास सहन करावा लागत असल्याचे दिनांक १२ एप्रिल, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन प्रवाशांच्या सुरक्षिततेच्यादृष्टीने नियमांचे अंमलबजावणी न करणाऱ्या रिक्षाचालकांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (०८-०२-२०१९) :** (१) होय.
(२) राज्यातील परिवहन कार्यालयांतील वायुवेग पथकांव्दारे नियमांचे उल्लंघन करणाऱ्या ऑटोरिक्षांवर माहे एप्रिल, २०१७ ते माहे सप्टेंबर, २०१८ या कालावधीत १,४८,८४१ वाहने तपासण्यात आली असून यामध्ये २१,६५४ वाहने दोषी आढळून आलेली आहे. त्यापैकी ६५६२ वाहनांची अनुज्ञप्ती व ५८६६ वाहनांचे परवाने निलंबित करण्यात आलेले आहे. सदर कारवाईतून रुपये ६९७.९१ लाख इतका महसूल दंड स्वरूपात वसूल करण्यात आलेला आहे.

तसेच ऑटोरिक्षाच्या संदर्भात मुंबई (मध्य/पश्चिम/पूर्व) या कार्यालयात माहे एप्रिल, २०१८ ते माहे ऑक्टोबर, २०१८ या कालावधीत जनतेकडून टोल फ्री क्रमांकावर ५३७ तक्रारी प्राप्त झालेल्या असून त्यापैकी ४२३ वाहनांची अनुज्ञप्ती निलंबित करण्यात आलेली असून ३९० वाहनांचे परवाने निलंबित करण्यात आलेले आहे. सदर कारवाईतून रुपये ११,७६,६००/- इतका महसूल शासनखाती जमा करण्यात आलेला आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सावर्डे (ता.चिपळूण, जि.रत्नागिरी) येथील महावितरण कंपनीच्या अधिकाऱ्यांनी गैरव्यवहार केल्याबाबत

**(३२) ४२४७१ (२०-०६-२०१८). ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, डॉ.सुधीर तांबे, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) केंद्र शासनाच्या दिन दयाळ ग्रामीण विद्युत योजनेंतर्गत जेथे वीज पुरवठा कमी दाबाने होतो त्या गावातील जनतेला या योजनेंतर्गत त्या त्या ठिकाणी रोहित्र तयार करून वीज पुरवठा करणाऱ्या योजनेंतर्गत सावर्डे गावासाठी (ता.चिपळूण, जि.रत्नागिरी) दोन रोहित्रे मंजूर करण्यात आलेली आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सावर्डे गावासाठी मंजूर करण्यात आलेले सदरहू रोहित्रे महावितरणच्या संबंधित अधिकाऱ्यांनी अधिकाराचा दुरुपयोग करून बेकायदेशीररित्या जिल्हयातील अन्य तालुक्यात हलविण्याचा गैरव्यवहार केल्यामुळे सावर्डे गावातील जनतेत असंतोष पसरलेला असून सदरहू मंजूर झालेली रोहित्रे विनाविलंब सावर्डे गावात उभारण्यात यावी म्हणून लेखी निवेदनाद्वारे संबंधित अधिकाऱ्यांकडे माहे मार्च, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान मागणी केलेली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सावर्डे गावासाठी मंजूर करण्यात आलेली सदरहू दोन रोहित्रे अन्यत्र हलविण्याची सर्वसाधारण कारणे काय असून मंजूर झालेली दोन्हीही रोहित्रे विनाविलंब सावर्डे गावात उभारण्याच्यादृष्टीने शासनाकडून कोणती कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (०९-०७-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२), (३) व (४) सदर मंजूर असलेल्या रोहित्रासाठी सावर्डे गावात आवश्यक ठिकाणी जागा उपलब्ध न झाल्याने पोमेंडी (शृगारतळी शाखा), ता.चिपळूण येथे नवीन रोहित्र उभारुन कार्यान्वित करण्यात आले आहे. तद्नंतर सावर्डेकरवाडी व मराठी शाळा, सावर्डे येथे जागा उपलब्ध झाल्यामुळे आता त्याठिकाणी रोहित्र उभारणी प्रस्तावित आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## चंद्रपूर जिल्हयातील शेतकऱ्यांना कर्जमाफीचा लाभ देण्याबाबत

**(३३) ४२५२६ (२८-०६-२०१८). श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चंद्रपूर जिल्ह्यात खरीप हंगाम येवूनही शेतकऱ्यांना कर्ज माफीचा लाभ मिळाला नसल्याने बहुतांश शेतकरी कर्जमाफी पासून वंचित असल्याचे दिनांक ११ मे, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्यातील थकीत कर्जास शासनाने कर्जमाफी देवूनही खरीप हंगामापूर्वी तात्काळ कर्ज देण्याचे आदेश जिल्हाधिकारी व बँकाना देवूनही जिल्ह्यातील बऱ्याच बँका शेतकऱ्यांच्या खात्यात अद्याप पैसे जमा न करता त्यांना त्रास देत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले, त्यानुसार संबंधित शेतकऱ्यांना कर्ज उपलब्ध होण्याकरीता बँकाना आदेश देण्याची कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (१६-०७-२०१८) :** (१) नाही.

छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजनेंतर्गत चंद्रपूर जिल्ह्यातील १ लाखाच्या वर खातेदारांना रुपये ३७५.८२ कोटीचा लाभ देण्यात आला आहे.

(२) नाही.

चंद्रपूर जिल्ह्यात दिनांक ३० जून, २०१८ अखेरपर्यंत बँकांनी ५३४५३ खातेदारांना रुपये ३८१ कोटी पीक कर्ज वाटप केले आहे.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## शेंबळ (ता.वरोरा, जि.चंद्रपूर) येथील शेतकऱ्यांना योग्य मोबदला मिळणेबाबत

**(३४) ४२५३० (२८-०६-२०१८). श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शेंबळ (ता.वरोरा, जि.चंद्रपूर) येथील करंजी पॉवर ग्रीडपासून भूगाव (जि.वर्धा) पर्यंत २२० के.व्ही. मल्टी सर्किट लिलो अती उच्चदाब विद्युत वाहिनीचे टॉवरचे काम सुरू असून सदर टॉवर शेतकऱ्यांच्या शेतात

शेतकऱ्यांना योग्य मोबदला न देता मनमानीपणे टाकले जात असल्याचे दिनांक १ मे, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर टॉवर उभारणीला शेतकऱ्यांनी विरोध दर्शविला असता संबंधित कंत्राटदार यांनी शेतकऱ्यांना मारहाण केली, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार संबंधित कंत्राटदारावर गुन्हे दाखल करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१३-०७-२०१८)** : (१) महापारेषण कंपनीकडून २२० के.व्ही. वर्धा-२ (भूगाव) ते २२० के.व्ही. वरोरा या वाहिनीवर नवीन ४०० के.व्ही. वरोरा उपकेंद्रापर्यंत लिलो पध्दतीने १०.५ कि.मी. २२० के.व्ही. बहुपथ वाहिनी उभारण्यात येत आहे. सदर वाहिनीचे काम डिसेंबर, २०१७ पर्यंत सुमारे ९५ % काम पूर्ण झाले आहे. मौजे शेंबळ येथील मनोरा उभारण्याचे काम सन २०१५-१६ मध्ये पूर्ण झाले आहे. वाहिनीचे उर्वरित तारा ओढण्याचे काम सुरु असताना मौजे शेंबळ येथील एका शेतकऱ्याने नुकसान भरपाई पोटी अवास्तव व नियमबाहय रकमेची मागणी करत तीव्र विरोध केल्याने जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांच्या आदेशानुसार पोलीस बंदोबस्तात काम सुरु करण्यात आले.
(२) व (३) पोलीस अधीक्षक, चंद्रपूर यांनी दिलेल्या अहवालाप्रमाणे संबंधित कामगार व शेतकरी यांनी परस्परांविरुध्द तक्रार दाखल केली आहे. त्यानुसार पोलीस स्टेशन वरोरा जि.चंद्रपूर येथे एफ.आय.आर. क्र.४५५/१८ कलम ३२४, ५०४, २९४ अन्वये गुन्हा दाखल झालेला असून दोषारोपपत्र दाखल करण्याची कार्यवाही पोलिसांकडून सुरु आहे.

तसेच एफ.आय.आर. क्र. ४९७/१८ कलम ३२५, ३४ अन्वये गुन्हा दाखल झालेला असून दोषारोप पत्र क्र. ७४/२०१८ दिनांक ०५/०६/२०१८ रोजी पोलिसांनी दाखल केले आहे व सदरचे प्रकरण न्यायप्रविष्ट आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नागपूर येथील इंदिरा गांधी रूग्णालयात (मेयो) सोयीसुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत

**(३५) ४३४२३ (०१-०८-२०१८). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) इंदिरा गांधी रूग्णालय (मेयो), नागपूर येथील परिसरात घाण, दुर्गंधी, अस्वच्छता व असुविधेमुळे रुग्णांची गैरसोय होत असून रूग्णालयात अनेक वार्डामध्ये कुलर व पंखे नाहीत, पिण्याच्या पाण्याची सोय नाही, रुग्णालय परिसरात सार्वजनिक शौचालय नाही, त्यामुळे रुग्णांची व त्यांच्या नातेवाईकांची गैरसोय होत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर रुग्णालय परिसर स्वच्छ ठेवून सोयीसुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (११-०२-२०१९) :** (१) हे खरे नाही.

(२) व (३) लागू नाही.

---

## राज्यातील २ हजार २८३ गावांमध्ये विदयुतीकरण नसल्याबाबत

**(३६) ४३४७० (२०-०६-२०१८). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात १.०७ लाख छोटी गावे असून यातील २ हजार २८३ गावांमध्ये विद्युतीकरण झाले नसल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील ग्रामीण भागात १ कोटी ४० लाख २६ हजार ३५३ घरे आहेत. मात्र २.३४ लाख घरांमध्ये विद्युतीकरण झाले नसुन राज्यातील काही जिल्हयांमध्ये घरगुती ग्राहकांकडे विद्युतीकरणाचा हाती घेतलेला प्रकल्प अत्यंत संथगतीने सुरू आहे व नंदुरबार येथे ७८ टक्के विद्युतीकरण झाले तर गडचिरोली मध्ये विद्युतीकरण अनेक गावांत नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (०९-०७-२०१८) :** (१) राज्यात एकूण ४१९२८ गावे असून त्यांचे विद्युतीकरण झालेले आहे. तसेच एकूण १००६३९ वाडी-पाडे असून त्यापैकी ९९३९९ वाडी-पाड्यांचे विद्युतीकरण महावितरणमार्फत व १७२ वाडी-पाड्यांचे विद्युतीकरण महाऊर्जेमार्फत करण्यात आले असून उर्वरित १०६८ वाडी-पाड्यांपैकी २२२ वाडी-पाड्यांचे विद्युतीकरण मा.पंडित दिनदयाळ उपाध्याय ग्राम ज्योती योजनेंतर्गत, ११७ वाडी-पाड्यांचे विद्युतीकरण जिल्हा वार्षिक नियोजन योजनेंतर्गत, ५८९ वाडी-पाड्यांचे विद्युतीकरण अपारंपारिक पध्दतीने महाऊर्जेमार्फत व उर्वरित १४० वाडी-पाड्यांचे विद्युतीकरण सौभाग्य योजनेंतर्गत करण्याचे प्रस्तावित आहे.
(२) ऑक्टोबर, २०१७ रोजीच्या उपलब्ध आकडेवारीनुसार राज्यातील ग्रामीण भागात १,४०,६१,३९२ घरे असून त्यापैकी १,३८,६३,५६४ घरांचे विद्युतीकरण करण्यात आले आहे. उर्वरित १,९७,८२८ घरांच्या विद्युतीकरणाचे काम मा.पंडित दिनदयाळ उपाध्याय ग्राम ज्योती योजना व सौभाग्य योजनेंतर्गत प्रस्तावित असून कामे प्रगतीपथावर आहेत. नंदुरबार जिल्ह्यातील घरांचे ८३.२९ टक्के विद्युतीकरण झाले आहे. तसेच, गडचिरोली जिल्ह्यातील १००% गावाचे विद्युतीकरण करण्यात आले आहे. तथापि, गडचिरोली व नंदुरबार जिल्ह्यातील २१२ गावांचे पुन:विद्युतीकरण करावयाचे होते. त्यापैकी महावितरण कंपनीमार्फत १७४ व महाऊर्जेमार्फत ३८ गावाचे पुन:विद्युतीकरण प्रस्तावित होते. माहे एप्रिल, २०१८ अखेर महावितरण कंपनीमार्फत १०९ गावांचे व महाऊर्जेमार्फत २२ गावांचे असे एकूण १३१ गावांचे पुन:विद्युतीकरण करण्यात आले आहे. उर्वरित ८१ गावांपैकी ६५ गांवाचे पुन:विद्युतीकरणाचे काम महावितरण कंपनीमार्फत व १६ गावांचे पुन:विद्युतीकरणाचे काम महाऊर्जेमार्फत प्रगतीपथावर आहे.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई विद्यापीठाचा बृहत आराखडा तयार करण्याबाबत

**(३७) ४३६४४ (०१-०८-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई विद्यापीठाचा बृहत आराखडा तयार करण्याकरीता विद्यार्थ्यांसह समाजातील विविध क्षेत्रातील नामांकित व्यक्तींच्या सूचना मागविण्याकरीता ऑनलाईन सर्व्हेक्षण करण्यात येत असल्याचे माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान जाहीर करण्यात आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू सर्व्हेक्षणाचे काम पूर्ण झाले आहे काय, यात किती सूचना प्राप्त झाल्या आहेत, तसेच या सूचनांचा आराखड्यात समावेश करण्यात आला आहे काय ?

**श्री.विनोद तावडे (११-०२-२०१९) :** (१) होय हे खरे आहे.
(२) सदरहू सर्व्हेक्षणाचे काम पूर्ण झाले असून मुंबई विद्यापीठाने केलेल्या अहवालास अनुसरुन एकूण २१३५ सूचना विद्यापीठास प्राप्त झाल्या होत्या. सदर सूचनाचा आराखड्यात समावेश करण्यात आला आहे.

---

## सोलापूर कृषी बाजार समितीमध्ये संचालक मंडळ व सचिवांनी संगनमताने गैरव्यवहार केल्याबाबत

**(३८) ४३६९२ (१९-०६-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सोलापूर कृषी बाजार समितीमध्ये दिनांक १ एप्रिल, २०११ ते दिनांक १७ ऑक्टोबर, २०१७ या कालावधीत संचालक मंडळ व सचिवांनी संगनमताने ३९ कोटी ६ लाख ३९ हजार १९३ रूपयांचा गैरव्यवहार केल्याप्रकरणी विशेष लेखापरिक्षकांनी जेलरोड पोलीस ठाण्यात माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान गुन्हा दाखल केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर तक्रारीच्या अनुषंगाने शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कारवाई करण्यात आली वा येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०९-०७-२०१८) :** (१) होय.
(२) पोलीस आयुक्त, सोलापूर यांच्या अधिपत्याखालील आर्थिक गुन्हे शाखेमार्फत सदर तक्रारीच्या अनुषंगाने चौकशी चालू आहे. तसेच नुकसानीची जबाबदारी निश्चित करण्यासाठी संबंधितांना नोटीस बजावून त्यांचे म्हणणे ऐकल्यानंतर एकसदस्यीय न्यायाधिकरणाची नियुक्ती करण्याचे विचाराधीन आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## उमरगा (जि.उस्मानाबाद) तालुक्यातील साठवण तलावासाठी पाण्याखाली गेलेल्या जमीनीचा मोबदला देण्याबाबत

**(३९) ४३७१५ (०२-०८-२०१८). ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राजाराम नागोराव सुरवसे, राहणार मु.पो.कोराळ, व्हाया दालीव (ता.उमरगा, जि.उस्मानाबाद) यांची विहिर व ५ एकर जमीन कृष्णा खोरे साठवण तलावाच्या पाण्याखाली गेल्याने त्यांनी जमिनीचा मोबदला मिळण्याबाबत दिनांक २७ मार्च, २०१८ रोजी मा.महसूल मंत्री यांना निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने बाधित कुटुंबाला नुकसान भरपाईचा मोबदला देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१२-०२-२०१९) :** (१) होय.

(२) सदर निवेदनाची प्रत जिल्हाधिकारी, उस्मानाबाद यांना आवश्यक त्या कार्यवाहीसाठी पाठविण्यात आली आहे. उपविभागीय अधिकारी तथा भूसंपादन अधिकारी, उमरगा यांनी त्यांचे अभिलेख तपासले असता श्री.राजाराम नागोराव सुरवसे यांचे नाव साठवण तलाव कोराळ/ दावमल्लीकवाडी, ता.उमरगाच्या भूसंपादन केलेल्या प्रस्तावामध्ये दिसून येत नाही. त्यावरुन त्यांची जमीन संपादित न झाल्याचे दिसून येत आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पालघर जिल्ह्यातील आदिवासी पाड्यांमध्ये मूलभूत सुविधांचा अभाव असल्याबाबत

**(४०) ४३८५३ (०१-०८-२०१८). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पालघर जिल्ह्यातील आदिवासी पाड्यांमध्ये मूलभूत सुविधांचा अभाव असल्यामुळे तेथील रहिवाश्यांना दैनंदिन जीवनात अनेक अडचणींना सामोरे जावे लागत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, ह्या आदिवासी पाड्यांमध्ये काही वर्षांपूर्वी जलजोडणी करण्यात आली असून सदर जलजोडणीद्वारे अद्यापपर्यंत पाणीपुरवठा होत नसुन या सर्व आदिवासी पाड्यांमधील रस्त्यांची तसेच आरोग्य यंत्रणेची अवस्था अत्यंत दयनीय झाली असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार पालघर जिल्ह्यातील आदिवासी पाड्यांमधील रहिवाश्यांना मूलभूत सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी शासन काही उपाययोजना करणार आहे काय,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (२४-०१-२०१९) :** (१) व (२) खरे नाही.

(३) पालघर जिल्ह्यात राष्ट्रीय ग्रामिण पेयजल कार्यक्रमांतर्गत सन २०१७-१८ मध्ये मंजूर १९ कामे प्रगतीपथावर आहेत. सन २०१८-१९ मध्ये एकूण १०४ योजना प्रस्तावित आहेत. दुहेरी पंप सौर योजनेंतर्गत १४ ल.न.पा.पु योजनांद्वारे पाणीपुरवठा सुरू करण्यात आला आहे.

मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत १८ योजना प्रस्तावित असून त्यापैकी १५ कामांना तांत्रिक मान्यता प्राप्त झाली आहे. त्यापैकी ९ कामे सुरू करण्यात आली आहेत. ३ कामे कार्यादेश स्तरावर व २ कामे फेरनिविदा तसेच १ काम निविदा मंजूरी स्तरावर आहेत. २ कामे तांत्रिक मंजूरीसाठी आहेत. १ काम तांत्रिक कारणास्तव रद्द करण्याचे प्रस्तावीत आहे.

ठक्कर बाप्पा आदिवासी वस्ती सुधार कार्यक्रमांतर्गत एकूण ६२९ योजना प्रस्तावित असून त्यापैकी २४८ कामे पूर्ण झाली आहेत व २०० कामे प्रगतीपथावर आहेत. तसेच उर्वरीत ५४ कामांची निविदा प्रक्रिया सुरू आहे. १२७ कामांची पुढील प्रक्रिया सुरू आहे.

मानव विकास कार्यक्रमांतर्गत १६ सौर ऊर्जेवर आधारीत ल.न.पा.पु योजनांद्वारे पाणीपुरवठा सुरू आहे.

प्राथमिक आरोग्य केंद्र कार्यक्रमांतर्गत पाणी पुरवठ्याची ५५ कामे मंजूर असून त्यापैकी ३३ कामे पूर्ण झाली असून १० कामे प्रगतीपथावर आहेत व उर्वरीत १२ कामांची निविदा प्रक्रिया सुरू आहे.

जलयुक्त शिवार अभियानांतर्गत १६९ कामे मंजूर असून त्यापैकी ५९ कामे पूर्ण झाली आहेत. ७७ कामे प्रगतीपथावर आहेत व २३ कामे कार्यादेश स्तरावर असून उर्वरीत १० कामांची निविदा प्रक्रिया सुरू आहे. तसेच ३०५ विंधन विहिरी खोदण्यात आल्या असून यशस्वी २५० विंधन विहिरींवरती हातपंप उभारणी करण्यात आली आहे.

शासन निर्णय दिनांक २०/०५/२०१६ अन्वये जिल्हा शल्य चिकित्सक, कार्यालय पालघर व अनुषंगिक पदे मंजूर करण्यात आली आहेत. जिल्हा शल्य चिकित्सक यांचे कार्यालय तात्पुरत्या स्वरूपात ग्रामीण रूग्णालय, पालघर यांचे आवारात सुरू करण्यात आले आहे.

जिल्हा शल्य चिकित्सक, पालघर यांचे अधिपत्याखाली ३ उपजिल्हा रूग्णालये तसेच ९ ग्रामीण रूग्णालये कार्यरत आहेत.

आरोग्य विभाग, जिल्हा परिषद, पालघर अंतर्गत आदिवासी क्षेत्रात ३६ प्राथमिक आरोग्य केंद्र व २६ उपकेंद्र कार्यरत आहेत.

पालघर जिल्हयामध्ये एकूण ३५७७ पाडे/वाड्या असून त्यापैकी ३५४५ पाडे/वाड्या रस्त्याने जोडलेले आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील सर्व वाहनांच्या हेडलाईटला काळा ठिपका नसल्याने अपघातात वाढ होत असल्याबाबत

**(४१) ४३९२८ (०२-०८-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील सर्व वाहनांच्या हेडलाईटला काळा ठिपका परिवहन विभागाने आधोरेकित केला होता, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त वाहनांच्या हेडलाईटवरील काळा ठिपका दिसत नसल्याची बाब माहे जून, २०१८ च्या पहिल्या आठवड्यात निदर्शनास आली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, वाहनांच्या हेडलाईटवर काळा ठिपका नसल्यामुळे प्रखर प्रकाश पडून समोरील वाहन चालकाचे डोळे दिपून जात असल्यामुळे रस्त्यावरील अपघातात वाढ झाली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, हेडलाईटवरील काळा ठिपका कधीपासून काढण्यात आला व त्याबाबतची माहिती वाहन चालकांना देण्यात आली होती काय, त्याचे थोडक्यात स्वरुप काय आहे,

(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (०८-०२-२०१९) :** (१) ते (४) मुंबई मोटार वाहन नियम १९५९ च्या नियम १४६ उप नियमानुसार परिवहन वाहनांच्या हेडलाईटच्या मध्यभागी काळा ठिपका लावण्याची तरतुद होती. तथापि, केंद्रीय मोटार

वाहन नियम, १९८९ हे दिनांक ०१/०७/१९८९ पासून अंमलात आल्याने सदर दिनांकापासून हेडलाईटवरील काळा ठिपका लावण्याची तरतुद वगळण्यात आलेली आहे.

केंद्रीय मोटार वाहन नियम, १९८९ च्या नियम १०६ मध्ये दिव्यांची वक्रता (Deflection of lights) याबाबत तरतूद आहे. सदर केंद्रीय मोटार वाहन नियम, १९८९ च्या नियम १२४ व १२४(A) अंतर्गत केंद्र शासनाने अधिसूचित केलेल्या प्रकाश किरणांबाबत (Headlight beam) लागू असलेल्या सुरक्षा मानकांचे पालन वाहन उत्पादकाने करणे बंधनकारक केले आहे. केंद्र शासनाने दिनांक १३/१२/२००४ व दिनांक ३०/०३/२०१५ च्या अधिसूचनेन्वये दिनांक ०१/०४/२००५ पासून निर्मित दुचाकी व तीनचाकी वाहनांकरीता तसेच दिनांक ०१/१०/२००५ पासून निर्मित चारचाकी वाहनांकरीता उपरोक्त संदर्भाने सुरक्षा मानके AIS-०३४/२००४ लागू केली आहे. ज्यामुळे वाहन चालकाचे डोळे हेडलाईटच्या प्रकाश किरणांमुळे दिपले जाणार नाहीत.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात पंतप्रधान आवास योजनेतून घरे बांधताना खाजगी जमीन मालकांना संयुक्त भागिदारी तत्वावर सहभागी करुन घेण्याच्या निर्णयाबाबत

**(४२) ४४१२३ (०५-१२-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.हुस्नबानू खलिफे, ॲड.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील आर्थिक दुर्बल घटक व अल्प उत्पन्न गटातील लाभार्थ्यांसाठी पंतप्रधान आवास योजनेतून घरे बांधतांना यापुढे खाजगी जमीन मालकांना संयुक्त भागिदारी तत्वावर सहभागी करुन घेण्याबाबत दिनांक ७ ऑगस्ट, २०१८ रोजी वा त्यासुमारास निर्णय घेण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर निर्णयानुसार खाजगी जमीन मालकांना कोणत्या सुविधा अथवा लाभ देण्यात येणार आहेत तसेच उक्त निर्णयाचे स्वरुप काय आहे व त्यानुसार कोणती कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (०७-०२-२०१९) :** (१) खाजगी जमीनमालक व म्हाडा यांच्यातील संयुक्त भागीदारीच्या माध्यमातून प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत घरकुलांची निर्मिती करण्यास दिनांक ११/०९/२०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

(२) १) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना व दिनांक ०९/१२/२०१५ च्या शासन निर्णयानुसार लाभार्थ्यांना केंद्र शासनाचे रुपये १/१.५ लक्ष व राज्य शासनाचे रुपये १ लक्ष अनुदान देण्यात येत आहे.

२) संयुक्त भागीदारी धोरणांतर्गत पात्र गृहप्रकल्पांना रहिवाशी क्षेत्रात २.५ चटई क्षेत्रफळ निर्देशांक (FSI) तर हरीत क्षेत्रात (Green Zone) १.० चटई क्षेत्रफळ निर्देशांक (FSI) अनुज्ञेय करण्यात आली आहे.

३) संयुक्त भागीदारी (Joint Venture) धोरणांतर्गत पात्र गृहप्रकल्पांना मोजणी शुल्कात ५०% सूट देण्यात येत आहे.

४) प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटक व अल्प उत्पन्न गटातील पात्र लाभार्थ्यांच्या पहिल्या दस्तास केवळ रुपये १०००/- मुद्रांक शुल्क निश्चित करण्यात आली आहे.

५) संयुक्त भागीदारी धोरणांतर्गत पात्र गृहप्रकल्पांना विकास शुल्कात सूट देण्यात येत आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## गडचिरोली जिल्हाधिकारी कार्यालयातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(४३) ४४२७७ (३०-११-२०१८). श्री.रामदास आंबटकर, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) गडचिरोली जिल्हाधिकारी कार्यालयातील "अ" वर्ग श्रेणीचे १५३ पदे रिक्त असल्याचे दिनांक १७/९/२०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, रिक्त पदांमुळे नागरीकांची कामे विहित मुदतीत होत नसून नागरीकांची गैरसोय होत आहे, तसेच सदरहू कामाचा अतिरिक्त कार्यभार प्रभारी अधिकाऱ्यांवर येत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (३०-०१-२०१९) :** (१), (२) व (३) गडचिरोली जिल्हाधिकारी कार्यालयातील गट-अ मधील अपर जिल्हाधिकारी सवंर्गातील-१, उपजिल्हाधिकारी संवर्गातील-५, तहसिलदार संवर्गातील-१, अशी एकूण ७ पदे रिक्त आहेत.

सदर रिक्त पदांचा कार्यभार अतिरिक्त स्वरुपात इतर अधिकाऱ्यांकडे सोपविण्यात येवून नागरिकांची गैरसोय होणार नाही, याची दक्षता घेण्यात आली आहे. पदोन्नतीच्या कोट्यातील रिक्त पदे पदोन्नतीने व सरळसेवेच्या कोट्यातील रिक्त पदे शासनाच्या प्रचलित धोरणानुसार सरळसेवेने भरण्याचे संकल्पित आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांच्या प्रलंबित मागण्यांबाबत

**(४४) ४४४७१ (०५-१२-२०१८). श्री.आनंदराव पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.मोहनराव कदम, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांच्या प्रलंबित मागण्यासंदर्भात महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद कर्मचारी युनियनने दिनांक ७ ऑगस्ट, २०१८ रोजी वा त्यासुमारास एक दिवसीय संप पुकारला, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांच्या प्रलंबित मागण्या पूर्ण करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१३-०२-२०१९) :** (१) होय.
(२) राज्यातील सर्व जिल्हा परिषद कर्मचारी संघटनांची मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १५/११/२०१८ रोजी बैठक घेण्यात आली. सर्व संघटनांच्या प्रलंबित मागण्यासंदर्भात सविस्तर चर्चा करण्यात आली असून रास्त मागण्यांबाबत शासनस्तरावर सकारात्मक कार्यवाही सुरु आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## माढा तालुका (जि.सोलापूर) पंचायत समितीची नवी इमारत वापराविना पडून असल्याबाबत

**(४५) ४४४८३ (०५-१२-२०१८). ॲड.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.मोहनराव कदम, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) माढा तालुका (जि.सोलापूर) पंचायत समितीची नवी इमारत प्रशासनाच्या दुर्लक्षामुळे उद्घाटन न झाल्याने वापराविना पडून आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अनेक प्रशासकीय अडचणी निर्माण होत आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने उद्घाटन करुन तेथे पंचायत समितीची सर्व कार्यालये वर्ग करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (११-०२-२०१९) :** (१) व (२) हे खरे नाही.
(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## बीड जिल्हयातील महसूल विभागातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(४६) ४५४२१ (३०-११-२०१८). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) बीड जिल्हयातील महसूल प्रशासनासह इतर विभागात रिक्त पदांमुळे प्रशासकीय कामावर परिणाम होत असून एकाच अधिकाऱ्यांवर मूळ पदासह इतर अनेक पदांची जबाबदारी असल्यामुळे कामाचा ताण येत असल्याकारणाने अधिकारी बदली करुन घेत आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अनेक शासकीय योजनेचा लाभ नागरीकांना मिळत नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (३१-०१-२०१९) :** (१), (२) व (३) बीड जिल्हयात गट-अ मधील अपर जिल्हाधिकारी सवंर्गातील-१, उपजिल्हाधिकारी संवर्गातील-४, तहसिलदार संवर्गातील-२ अशी एकूण ७ तसेच गट-ब मधील नायब तहसिलदार संवर्गातील-१५ आणि गट-क मधील १५१ व गट-ड मधील ३१ अशी रिक्त पदे आहेत.

सदर रिक्त पदांचा कार्यभार अतिरिक्त स्वरुपात इतर अधिकारी / कर्मचाऱ्यांकडे सोपविण्यात आला आहे. त्यामुळे शासकीय योजनांवर कोणताही परिणाम होणार नाही, याची दक्षता घेण्यात आली आहे.

पदोन्नतीच्या कोट्यातील रिक्त पदे पदोन्नतीने व सरळसेवेच्या कोट्यातील रिक्त पदे शासनाच्या प्रचलित धोरणानुसार सरळसेवेने भरण्याचे संकल्पित आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद येथील शिक्षकेतर पदांचे पदनाम व वेतनश्रेणीमध्ये सुधारणा करण्याबाबत

**(४७) ४५६२५ (३०-११-२०१८). श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद येथील शिक्षकेतर पदांचे पदनाम व वेतनश्रेणी सुधारणा करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास माहे फेब्रुवारी, २०१३ च्या तिसऱ्या सप्ताहात सादर केला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील पुणे विद्यापीठ, कोल्हापूर विद्यापीठातील शिक्षकेतर पदांचे पदनाम व वेतनश्रेणी सुधारण्याबाबतच्या प्रस्तावाला मान्यता देण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठातील शिक्षकेतर पदांच्या पदनाम व वेतनश्रेणी सुधारणा प्रस्तावास मान्यता देण्यास होणाऱ्या विलंबाची कारणे काय आहेत,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर प्रस्तावाला मान्यता देण्याबाबत कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (११-०२-२०१९) :** (१) प्रश्नात नमूद विद्यापीठाचा प्रस्ताव दिनांक १०/०३/२०११, दिनांक १७/१२/२०१२ अन्वये शासनास प्राप्त झाला.

(२) होय, हे खरे आहे.

(३) व (४) पदनाम बदल करताना वेतनश्रेण्या बदलल्यामुळे वित्तीय कार्यप्रणालीचा भंग झाल्याचे आढळून आल्याने पदनाम बदलाबाबतचे सर्व शासन निर्णय, दिनांक १७ डिसेंबर, २०१८ च्या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात आलेले आहेत.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई-दिल्ली द्रुतगती महामार्गाच्या कामाबाबत

**(४८) ४५७३८ (३०-११-२०१८). श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई-दिल्ली द्रुतगती महामार्गाचे काम माहे डिसेंबर, २०१८ पासून सुरु करुन ते अडीच ते तीन वर्षात पूर्ण करण्याचे प्रस्तावित असून यासाठी सुमारे रुपये एक लाख कोटी खर्च येणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त महामार्गामुळे बाधितांचे पुनर्वसन कशाप्रकारे करण्यात येणार आहे तसेच उक्त प्रकल्पासाठी राज्य शासनास किती निधी द्यावा लागणार आहे व सदर निधी कशाप्रकारे उपलब्ध करण्यात येणार आहे,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येणार आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१२-०२-२०१९) :** (१) मुंबई-दिल्ली द्रुतगती महामार्ग प्रकल्प हा निरनिराळया भागांमध्ये विभागला गेला असून त्यापैकी वडोदरा-मुंबई द्रुतगती महामार्ग भागांतर्गत महाराष्ट्र राज्यामधील एकूण २०७.१४ कि.मी. महामार्गाचा समावेश आहे. सदर वडोदरा-मुंबई द्रुतगती मार्गाचे काम फेज I ते फेज III मध्ये केंद्र शासनाच्या भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकारणामार्फत करण्याचे प्रस्तावित आहे.

त्यानुसार फेज I मधील बहुतांशी भाग गुजरात राज्यातील असून महाराष्ट्र राज्यातील फक्त सुमारे ८.१५ कि.मी. लांबीच्या महामार्गाचा समावेश आहे. सदर ८.१५ कि.मी. महामार्गाचे काम फेज I अंतर्गतच्या तलासरी (महाराष्ट्र) ते किम (गुजरात) या सुमारे ६२९६.८० कोटी किंमतीच्या भागांतर्गत समाविष्ट असून सदर काम सद्य:स्थितीत निविदास्तरावर आहे, असे प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, सुरत यांनी कळविले आहे.

मुंबई-वडोदरा द्रुतगती मार्गाच्या फेज II व फेज III चा मिळून १९८.९९ कि.मी. चा भाग महाराष्ट्र राज्यात असून सदर काम प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, ठाणे यांचेमार्फत करण्याचे

प्रस्तावित असून याबाबतची सद्य:स्थिती त्यांचेकडून पुढीलप्रमाणे कळविण्यात आली आहे.

फेज II तलासरी ते कणेर (विरार) कि.मी. १०४.७०० ते कि.मी. २६.३२० :- ७८.३८ कि.मी.

स्पर अलाईनमेंट कणेर (विरार) ते जेएनपीटी पनवेल ०.०० ते ९४.२९० :- ९४.२९ कि.मी.

फेज II (मुख्य अलाईनमेंट व स्पर अलाईनमेंट) यांचा अंदाजित खर्च (भूसंपादन व इतर प्रीकन्सट्रक्शन अक्टीविटीज चा खर्च धरुन) सल्लागाराने कळविल्याप्रमाणे १४,३०० कोटी आहे. सद्य:स्थितीत फेज II साठी भूसंपादन व इतर प्रीकन्सट्रक्शन अक्टीविटीज सुरु आहेत. सदर प्रक्रिया पूर्ण होऊन केंद्र सरकारची मान्यता मिळाल्यानंतर निविदा मागवून त्यांनतर काम सुरु करण्यात येईल.

फेज III कणेर (विरार) ते घोडबंदर च्या प्रस्तावित अलाईनमेंट मधील बांधकामांचे स्वरुप मोठ्या प्रमाणातील असल्यामुळे फेज III चे किमी. ००/० ते २६.३२ चे काम रद्द करण्याचे प्रस्तावित आहे.

(२) मुंबई-वडोदरा द्रुतगती महामार्गामधील फेज II करीता आवश्यक असणाऱ्या भूसंपादनाची कार्यवाही NH Act-१९५६ आणि Right to Fair Compensation & Transparency in Land Acquisition, Rehabilitation and Resettlement Act-२०१३ चे Schedule-१,२ & ३ नुसार प्रगतीपथावर असून त्यानुसार संबंधित भूधारकांना सक्षम भूसंपादन प्राधिकारी यांनी निश्चित केलेली मोबदल्याची रक्कम अदा करण्यात येत आहे/येईल, असे प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, ठाणे यांनी कळविले आहे.

राज्य शासनाने किती निधी दयावा व निधी कश्याप्रकारे उपलब्ध करण्यात येणार आहे यासंदर्भात केंद्र व राज्य शासनस्तरावर योग्य तो निर्णय घेण्यात येईल.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

## पालघर जिल्हयात ओखी वादळामुळे बाधिक झालेल्या नुकसानग्रस्तांना मदत देण्याबाबत

**(४९) ४६०२९ (३०-११-२०१८). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पालघर जिल्हयात ओखी वादळामुळे नुकसान झालेल्या शेतकऱ्यांची संख्या किती आहे, पंतप्रधान विमा योजनेंतर्गत शेतकऱ्यांना विम्याची रक्कम देण्यात आली आहे काय, या योजनेतून विमा न मिळालेल्या शेतकऱ्यांची संख्या किती आहे, तसेच किती शेतकऱ्यांना विमा मिळाला नाही,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन ओखी वादळामुळे बाधित झालेल्या नुकसानग्रस्तांना मदत देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१६-०२-२०१९) :** (१) व (२) पालघर जिल्हयात दिनांक ०४ ते ०५ डिसेंबर, २०१७ रोजी झालेल्या ओखी चक्रीवादळामुळे पालघर व डहाणू तालुक्यातील १७३ शेतकऱ्यांच्या ८८.९६ हेक्टर क्षेत्रावरील भाजीपाला व नारळ पिकांचे नुकसान झाल्याचे दिसून आले. सदर आपत्तीमुळे बाधित झालेल्या शेतकऱ्यांना एकूण रुपये १०,५१,९९०/- इतक्या मदतीचे वितरण करण्यात आले आहे.

प्रधानमंत्री पीक विमा योजनेच्या शासन निर्णय दिनांक २०/०६/२०१७ नुसार पालघर जिल्हयातील भात, नागली व उडीद पिकासाठी विमा लागू करण्यात आला असून, भाजीपाला व नारळ पिकासाठी प्रधानमंत्री पीक विमा योजना लागू नसल्यामुळे पीक विमा देण्यात आला नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात खुल्या शासकीय जमिनींवरील अतिक्रमण रोखण्याबाबत

**(५०) ४६०८० (३०-११-२०१८). श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.रामदास आंबटकर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील एकूण खुल्या जमिनीचा डेटाबँक शासनाने तयार केला नाही, तसेच जिल्हा व तहसिलस्तरावरील शासकीय जमिनीवरील अतिक्रमणासंबंधी डेटा उपलब्ध नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, खुल्या शासकीय जमिनीवरील अतिक्रमण रोखण्याबाबत शासनास अपयश आले असून त्यामुळे शासनाचे नुकसान होत असल्याबाबत भारताचे नियंत्रक आणि महालेखापरिक्षक यांच्या माहे मार्च, २०१७ च्या अहवालात नमूद करण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१३-०२-२०१९) :** (१), (२) व (३) राज्यातील एकूण खुल्या जमिनीचा रेकॉर्ड म्हणजेच डेटा बँक शासनाने तयार केला नसल्याचे नियंत्रक आणि महालेखापरिक्षक यांच्या वर्ष २०१८ च्या क्रमांक ३ च्या अहवालात नमूद करण्यात आले आहे. तथापि, या कालावधीत जिल्हाधिकारी, वाशिम यांनी विकसित केलेल्या लॅन्ड बँक सिस्टीम नुसार अचुक डाटा बेस तयार करण्यासंबंधात सर्व जिल्हयांना दिनांक ११/०१/२०१८ ते १६/०१/२०१८ या कालावधीत प्रशिक्षण देण्यात आले. त्यानंतर संपूर्ण राज्यात "लॅन्ड बँक सिस्टीम" या संगणक प्रणालीचा उपयोग करुन जमिनीबाबत डाटा बेस तयार करण्याच्या सूचना शासनपत्र क्रमांक संकीर्ण २०१८/प्र.क्र.०५/ज-१, दिनांक ३० जानेवारी, २०१८ अन्वये सर्व जिल्हाधिकारी यांना देण्यात आल्या आहेत.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**विधान भवन :** **जितेंद्र भोळे**
**मुंबई.** **सचिव (कार्यभार),**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.